शासकीय जमीन व भरती-ओहोटीच्या क्षेत्रातील जमीन (Intertidal Zone Land) *"बंदर विकास धोरण-२०१६"* या धोरणांतर्गत मंजूर सागरी प्रकल्पांकरिता हस्तांतरीत करणे तसेच शासकीय जमिनीतून "राईट ऑफ वे" उपलब्ध करुन देण्याबाबत.................

# महाराष्ट्र शासन

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः जमीन-२०१६/प्र.क्र.५३/ज-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

**दिनांक : १८ मार्च, २०१७**

**वाचा:**

१. महाराष्ट्र शासन, महसूल व वन विभाग, शासन अधिसूचना क्रमांक जमीन-२०१५/प्र.क्र.५५/ज-१ दिनांक ३१.१२.२०१५

२. महाराष्ट्र शासन, गृह विभाग, शासन निर्णय क्रमांक धोरण-१०१५/प्र.क्र.२६५/बंदरे-१, दि. ४.२.२०१६

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र राज्याचे *" बंदर विकास धोरण-२०१६"* या धोरणास दिनांक २५.०१.२०१६ रोजी झालेल्या राज्य मंत्रिमंडळाच्या बैठकीत मान्यता देण्यात आली. त्या अनुषंगाने गृह विभागाने संदर्भाधीन क्र.२ येथे नमूद शासन निर्णय निर्गमित केला आहे. गृह विभागाच्या सदर शासन निर्णयानुसार, *" बंदर विकास धोरण ¬ २०१६"* यामध्ये हरितक्षेत्र बंदरे, जेट्टी, कोस्टल शिपींग आणि अंतर्गत जलमार्ग, जहाज बांधणी व जहाज दुरुस्ती (शिपयार्ड), किनारी आर्थिक परिक्षेत्र या उपक्षेत्रांचा समावेश आहे.

*" बंदर विकास धोरण -२०१६"* अन्वये राज्य शासनाचा गृह विभाग/ महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड यांच्याकडून मंजूर करण्यात येणाऱ्या सागरी प्रकल्पांत (Maritime Projects) अंतर्भूत असलेल्या शासकीय जमिनी महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डास नाममात्र दराने हस्तांतरित करणे, भरती-ओहोटीच्या क्षेत्रातील जमिनीचे मूल्यांकन करणे व खाजगी विकासकास हस्तांतरित करणे तसेच अशा प्रकल्पांतर्गत आवश्यक असलेल्या पाणीपुरवठा व वीजपुरवठा योजनांकरिता शासकीय जमिनींमधून *"नि:शुल्क राईट ऑफ वे (Right of Way)"* देण्यासंदर्भात सदर धोरणांतर्गत निर्णय घेण्यात आला आहे. सदर निर्णयाच्या अनुषंगाने महसूल विभागाच्या क्षेत्रिय अधिकारी व प्राधिकारी यांना अंमलबजावणीच्या दृष्टीने सविस्तर दिशा निर्देश निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार, पुढीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे-

**शासन निर्णय :-**

*" बंदर विकास धोरण-२०१६"* च्या तरतूदीनुसार शासनाच्या गृह (बंदरे) विभाग/ महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड यांच्याकडून मंजूर होणाऱ्या सागरी प्रकल्पांसाठी आवश्यक असलेल्या क्षेत्रात जर शासकीय जमीन **व** भरती-ओहोटी क्षेत्रातील जमीन समाविष्ट असेल तर अशी शासकीय जमीन सदर

प्रकल्प विकसित करण्यासाठी महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड यांना नाममात्र दराने प्रदान करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत असून, त्या अनुषंगाने महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ आणि महाराष्ट्र जमीन महसूल (सरकारी जमिनींची विल्हेवाट करणे) नियम, १९७१ मधील तरतूदी अन्वये प्राप्त अधिकारात महसूल विभागाच्या क्षेत्रिय अधिकारी व प्राधिकारी यांना पुढीलप्रमाणे दिशा निर्देश देण्यात येत आहेत:-

(i) *" बंदर विकास धोरण-२०१६"* नुसार ज्या सागरी प्रकल्पांना शासनाच्या गृह (बंदरे) विभाग/महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड यांची **मान्यता असेल,** अशा प्रकल्पांसाठी आवश्यक असलेले **क्षेत्र अधिसूचित** करण्यात आले असेल आणि अशा प्रकल्पांकरिता अधिसूचित केलेल्या क्षेत्रामध्ये, जर शासकीय जमीन **व** भरती-ओहोटी क्षेत्रातील जमीन समाविष्ट असेल तर, अशी शासकीय जमीन **व** भरती-ओहोटी क्षेत्रातील जमीन गृह (बंदरे) विभाग यांना जिल्हाधिकारी यांच्या स्तरावरून कब्जेहक्काने प्रदान करण्यात यावी.

तद्नंतर, अशी जमीन गृह (बंदरे) विभाग यांच्याकडून महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडे वार्षिक रुपये १/- या नाममात्र दराने भाडेपट्टयाने हस्तांतरीत करण्यास आणि भाडेपट्टयाने प्रदान केलेली अशी शासकीय जमीन पुढे महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडून जमिनीच्या मूल्यांकनाइतका समभाग सहभाग (equity participation) समजून असा प्रकल्प राबविणाऱ्या विशेष हेतू वाहन (Special Purpose Vehicle) कंपनीकडे रु. १/- या नाममात्र दराने पोट-भाडेपट्टयाने हस्तांतरीत करण्यास महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डास मुभा राहील. अशा जमिनीचे मूल्यांकन महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डामार्फत **<u>प्रचलित वार्षिक दर विवरणपत्रकानुसार</u>** करण्यात येईल.

मात्र, *"बंदर विकास धोरण - २०१६"* या धोरणांतर्गत मंजूर प्रकल्प राबविणाऱ्या विशेष हेतू वाहन (Special Purpose Vehicle) कंपनीकडे पोट-भाडेपट्टयाने हस्तांतरीत केलेल्या अशा जमिनीपोटी जर कोणत्याही प्रकारचे मूल्य महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडून आकारण्यात येणार असेल तर, अशा वेळी अशा मूल्यातील ५० टक्के रक्कम संबंधित जिल्हाधिकारी यांच्याकडे अनर्जित रकमेपोटी जमा करणे आवश्यक राहील.

(ii) *"बंदर विकास धोरण - २०१६"* या धोरणांतर्गत **मंजूर प्रकल्पांसाठी** आवश्यक **शासकीय जमिनींची रीतसर मागणी,** गृह (बंदरे) विभाग अथवा महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड यांनी संबंधित जिल्हाधिकारी यांच्याकडे केल्यानंतर, जिल्हाधिकारी यांनी महाराष्ट्र जमीन महसूल (सरकारी जमिनींची विल्हेवाट करणे) नियम, १९७१ च्या नियम ६ नुसार प्रचलित नियमातील कार्यपध्दती अनुसरुन त्यांच्या स्तरावरुन प्रकरणपरत्वे **निर्बाध्यरित्या वाटपास** उपलब्ध असलेली शासकीय जमीन गृह (बंदरे) विभाग, या विभागास कब्जेहक्काने प्रदान करण्याची कार्यवाही करावी.

(iii) *"बंदर विकास धोरण - २०१६"* या धोरणांतर्गत **मंजूर प्रकल्पांकरीता** आवश्यक असलेली **भरती-ओहोटीच्या क्षेत्रातील जमीन** जिल्हाधिकाऱ्यांकडून गृह (बंदरे) विभाग यांना

कब्जेहक्काने प्रदान करण्यात येईल. तद्नंतर, सदरहू जमीन गृह (बंदरे) विभाग यांच्या मार्फत महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडे भाडेपट्टयाने प्रदान झाल्यानंतर, अशा जमिनीचे मूल्यांकन हे या जमिनीला लागून असलेल्या **जिरायत (non-irrigated) जमिनीच्या प्रचलित वार्षिक दर विवरणपत्रकानुसार** येणाऱ्या मूल्यांकनावर निश्चित करण्यात यावे.

प्रकल्प राबविणाऱ्या खाजगी विकासकाकडून अशा जमिनीची महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडे मागणी करण्यात आल्यानंतर, सागरी प्रकल्पांकरिता आवश्यक असलेल्या भरती-ओहोटीच्या क्षेत्रातील जमिनीचे मूल्यांकन करणे व संबंधित विकासकाकडे हस्तांतरित करणे ही जबाबदारी महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाची राहील. विकासकाने मूल्यांकनाची रक्कम महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडे जमा केल्यानंतर, अशी जमीन प्रकल्प राबविणाऱ्या विशेष हेतू वाहन (Special Purpose Vehicle) कंपनीकडे किंवा विकासक कंपनीकडे वार्षिक रु. १/- या नाममात्र दराने पोट-भाडेपट्टयाने महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडून हस्तांतरीत करण्यात येईल.

(iv) महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाने बंदर विकास प्रकल्पांमध्ये समभाग (equity) घ्यावयाचा निर्णय घेतल्यास त्याबाबतची कार्यवाही *"बंदर विकास धोरण-२०१६"* मध्ये नमूद तरतूदीनुसार करण्यात येईल.

(v) वरीलप्रमाणे प्रदान केलेल्या शासकीय तसेच भरती-ओहोटीच्या क्षेत्रातील जमिनीचा वापर मंजूर प्रयोजनाकरीताच अनुज्ञेय राहील.

(vi) *"बंदर विकास धोरण-२०१६"* नुसार शासनाच्या गृह (बंदरे) विभागाने/महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाने मान्यता दिलेल्या सागरी प्रकल्पांसाठी आवश्यक असलेल्या पाणी पुरवठा व वीज पुरवठा प्रकल्पांकरिता शासकीय जमिनीमधून "***निःशुल्क राईट ऑफ वे (Right of Way)***" अनुज्ञेय राहील.

शासनाच्या गृह (बंदरे) विभागाने / महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाने *"बंदर विकास धोरण-२०१६"* अंतर्गत मान्यता दिलेल्या प्रकल्पांसाठी आवश्यक असलेल्या पाणी पुरवठा व वीज पुरवठा प्रकल्पांकरिता आवश्यक असलेल्या शासकीय जमिनींतील ***"राईट ऑफ वे (Right of Way)"*** विषयी अशा जमिनीसंदर्भात आवश्यक तो करारनामा जिल्हाधिकारी यांचे स्तरावर निष्पादित करण्यात यावा.

०२. सदर शासन निर्णय गृह (बंदरे) विभाग या विभागाच्या सहमतीने व त्यांचा अनौपचारिक ***संदर्भ क्रमांक- १९/बंदरे-१ गृह विभाग, दि. १५.१२.२०१६*** अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

०३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०१७०३१८१४५९४७४५१९** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Kshirsagar

Digitally signed by Rajendra Kshirsagar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3e673df1a1f6243d932fcb8679fc8cd85d90c61495ae8b4592f8dcc5b8a851a8, cn=Rajendra Kshirsagar
Date: 2017.03.18 17:14:54 +05'30'

**(राजेंद्र क्षीरसागर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३. मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
४. मा. राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
५. मा. राज्यमंत्री (बंदरे) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
६. मा. विरोधी पक्ष नेता, विधानसभा/विधानपरिषद, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
७. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-३२.
८. प्रधान सचिव (बंदरे), गृह (बंदरे) विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
९. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१०. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
१२. प्रधान सचिव (महसूल, मुद्रांक शुल्क व नोंदणी) यांचे स्वीय सहाय्यक, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१३. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन, सी.बी.डी.बेलापूर, नवी मुंबई
१४. जिल्हाधिकारी, रायगड, रत्नागिरी, सिंधुदुर्ग, पालघर, ठाणे, मुंबई शहर व मुंबई उपनगर
१५. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई.
१६. सर्व मंत्रालयीन विभाग
१७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर
१८. महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
१९. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
२०. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
२१. सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, महसूल व वन विभाग,मंत्रालय, मुंबई
२२. निवड नस्ती (कार्यासन ज-१)